आर्थिकदृष्टया दुर्बल घटकातील
विडी कामगारांना गृहनिर्माणासाठी
केंद्र शासनाप्रमाणे राज्य शासनाकडून
आर्थिक सहाय्य देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृहनिर्माण विभाग
शासन निर्णय क्रमांक : एचएसजी १०९९/प्र.क्र.१९७/गृनिधो-१
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १२ जुलै,२००१

**प्रस्तावना :** महाराष्ट्र राज्यातील विडी कामगारांना मिळणा-या वेतनामध्ये त्यांच्या दैनंदिन गरजा पूर्ण होत नाहीत. त्यातच विडी कारखान्यात काम करीत असतांना तेथे असलेल्या वातावरणाचा त्यांच्या आरोग्यावर विपरीत परिणाम होतो. राज्यातील विडी कामगार आर्थिकदृष्टया दुर्बल घटकामध्ये समाविष्ट होतात. म्हणून विडी कामगारांचे जिवनमान उंचावले जावे यासाठी केंद्र शासनाकडून मिळणा-या अनुदानासोबत राज्य शासनाने देखील तेवढयात प्रमाणात अनुदान दिले तर, त्या एकत्रित आर्थिक सहाय्यातून, राज्यातील विडी कामगारांच्या घरकुल योजना अधिक चांगल्या कार्यक्षमतेने राबविली जाऊन त्याचा लाभ विडी कामगारांना मिळून त्यांना अधिक चांगल्या प्रकारे घरे उपलब्ध करुन देता येईल.

केंद्र शासन विडीवरील सेसची रक्कम जमा करुन कल्याण निधीमध्ये ठेवते. या कल्याण निधीमधून विडी कामगारांच्या घरकुल योजना व इतर कल्याणकारी योजना राबविली जाते. विडी कामगारांच्या घरकुल योजनेसाठी केंद्र शासनाच्या श्रम मंत्रालयाद्वारा आर्थिकदृष्टया दुर्बल घटकाखालील विडी कामगारांच्या घरकुलांसाठी अनुदानामध्ये वेळोवेळी वाढ केली असून, जून,१९९९ पासून प्रत्येक घरकुलामागे रु.२०,०००/- अनुदान देण्यात येते.

केंद्र शासनाने आपले घर स्वतःच बांधा, सामुहिक गृहनिर्माण योजना आणि आर्थिकदृष्टया दुर्बल घटकांसाठी असणारी योजना या विडी कामगारांच्या तिन्ही घरकुल योजनांचे एकत्रिकरण करुन एकात्मिक योजना सुरु केलेली आहे. सदर योजनेचे स्वरुप आणि पात्रतेच्या अटी खालीलप्रमाणे आहेत :-

१. संबंधित विडी कामगारांनी विडी व्यवसायात किमान एक वर्ष काम केलेले असावे.
२. विडी कामगारांचे मासिक उत्पन्न रु.३५००/- पेक्षा अधिक नसावे.
३. त्याचे स्वतःचे किंवा त्यांच्या कुटुंबियांच्या मालकीचे घर नसावे.
४. कुटुंबातील एका सदस्याला या योजनेचा लाभ घेण्यास पात्र समजण्यात येईल.

५. सामुहिक घरकुल योजनेअंतर्गत किमान ५० लोकांनी एकत्र येऊन सहकारी गृहनिर्माण संस्था स्थापन करावी व ही संस्था नोंदणीकृत असावी.

केंद्र शासनाच्या श्रम मंत्रालयाद्वारा ज्या योजनेला मान्यता मिळेल त्या योजनेतील प्रत्येक घरकुलासाठी प्रत्येकी रु.२०,०००/- किंवा एका घराच्या बांधकाम खर्चाच्या ५० टक्के यातील कमी असणारी रक्कम अर्थसहाय्य म्हणून दिले जाते. हे अर्थसहाय्य खालीलप्रमाणे तीन हप्त्यात दिले जाते.

| | | |
|---|---|---|
| १) | पहिला हप्ता<br>(अनुदानाच्या ३५ टक्के) | जोत्यापर्यंत बांधकाम पूर्ण |
| २) | दुसरा हप्ता<br>(अनुदानाच्या ४० टक्के) | छपरापर्यंत बांधकाम पूर्ण |
| ३) | तिसरा हप्ता<br>(अनुदानाच्या २५ टक्के) | पूर्ण बांधकामानंतर |

केंद्र शासनाच्या उपरोक्त योजनेप्रमाणे राज्य शासनाकडूनही केंद्र शासनाएवढे अर्थसहाय्य मिळावे असा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. ही बाब विचारात घेऊन राज्यातील विडी कामगारांना केंद्र शासनाप्रमाणे प्रत्येक घरकुलासाठी आर्थिक सहाय्य देण्याबाबत राज्य शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

## शासन निर्णय

विडी कामगारांचे जिवनमान उंचावेल या हेतुने शासनाकडून विडी कामगारांच्या घरकुलांसाठी, केंद्र शासन ज्या विडी कामगाराच्या घरकुलास रु.२०,०००/- आर्थिक सहाय्य देते अशा विडी कामगारांना राज्य शासनाकडूनही प्रति घरकुल रु.२०,०००/- आर्थिक सहाय्य देण्यात यावे.

राज्यातील विडी कामगार घरकुल योजनेवर, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाच्या त्या त्या मंडळाच्या अखत्यारीत येत असलेल्या योजनांवर नियंत्रण राहील. त्यांनी योजनेच्या अनुषंगाने आवश्यक कार्यपध्दतीचा अवलंबन करुन अद्ययावत माहिती ठेवील.

अर्थसहाय्य वितरणाची पध्दती आणि विडी कामगारांची पात्रता निकष ही केंद्र शासनाच्या निकषाप्रमाणे आणि प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे राहील. विडी कामगारांच्या संस्थेमार्फत अनुदानासाठी केंद्र शासनाच्या श्रम मंत्रालयाकडे अर्ज करतील त्याची एक प्रत संस्थेने महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण तसेच त्या त्या मंडळाकडे सादर करणे बंधनकारक राहील. केंद्र शासन ज्या विडी कामगाराच्या घरकुलासाठी अनुदान वितरीत

जी आर एच एस जी १०११-सीआर १११-गनिधो-१/गनिधो-१ फोल्डर/खाजे
H-325(1500-7-01)la

GR·20020122161653000-1700

करेल त्या आदेशाची प्रत संस्थेने/लाभार्थ्याने महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाकडे सादर केल्यानंतर महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण निधीच्या उपलब्धतेनुसार टप्प्याटप्प्याने अर्थसहाय्य वितरीत करतील.

सदर योजना ग्रामीण स्तर, तालुका स्तर व जिल्हा स्तरावरील विडी कामगारांना लागू करण्यात यावी. जिल्हा नियोजन व विकास मंडळाच्या कार्यकक्षात येत असलेल्या घरकुल योजनेसाठी जिल्हा नियोजन व विकास मंडळाने विडी कामगारांच्या घरकुल योजनेसाठी आवश्यक निधी उपलब्ध करुन देण्यासाठी शिफारस करील.

या योजनेंतर्गत होणारा खर्च मागणी क्र. क्यू-४ , २२१६ गृहनिर्माण,८० सर्वसाधारण, १०३ गृहनिर्माण मंडळे इत्यादींना सहाय्य, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना,(बारा) विडी कामगारांना घरकुलासाठी अनुदान (२२१६ -१२०-२) या लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात येईल.

हा शासन निर्णय, उद्योग उर्जा व कामगार विभाग, नियोजन विभाग तसेच वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.विकअ/११/प्र.क्र.११८/आदान, दिनांक १०.८.२००० आणि १८९/४७००/व्यय ३, दिनांक २४.८.२००० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(शं.य.सोनावणे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री (गृ.नि.) यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री (गृ.नि.) यांचे खाजगी सचिव
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
६. मा.संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा व अनुज्ञेयता) लेखा परिक्षा
८. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा व अनुज्ञेयता) लेखा परिक्षा
९. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवीन मुंबई
१०. उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर विभाग

जी आर एच एम जी १०११-मीआर ११६-गानिधो-१/गनिधो-१ फोल्डर/बाजे
H-325(1500-7-01)2
GR 200201221616530000-1700

११. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई ५१
१२. सर्व जिल्हाधिकारी
१३. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१४. सर्व मंत्रालयीन विभाग
१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६. निवासी लेखा परिक्षक अधिकारी, मुंबई
१७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१८. वित्त नियंत्रक, म्हाडा, मुंबई
१९. मुख्य अधिकारी, मुंबई /कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपर गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ
२०. वित्त विभाग(व्यय-३ व अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई-३२.
२१. नियोजन विभाग(का.१४७४), मंत्रालय, मुंबई-३२.
२२. उद्योग , उर्जा व कामगार विभाग (कामगार-९), मंत्रालय, मुंबई-३२.
२३. उप सचिव, श्रम मंत्रालय, भारत सरकार, जयसलमेर हाऊस, मानसिंग रोड, नवी दिल्ली (रजिस्टर पोस्टाने)
२४. उप सचिव, नगर विकास मंत्रालय, भारत सरकार, जयसलमेर हाऊस, मानसिंग रोड, नवी दिल्ली (रजिस्टर पोस्टाने)
२५. कल्याण व उपकर आयुक्त, कामगार कल्याण संघटना, भारत सरकार, सीजीओ कॉम्प्लेक्स, ब्लॉक सी (दुसरा मजला ), सेमिनरी हिल्स, नागपूर - ४४० ००६
२६. सर्व कामगार आयुक्त
२७. सर्व विभागीय आयुक्त
२८. सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी
२९. सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३०. निवडनस्ती - गृनिधो-१

——x——x——